**पथदर्शक हवामान आधारित पीक विमा योजना २००९**
**कपाशी पीकावर ६ तालुक्यात पथदर्शक योजना**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि , पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः हपिवियो-२००९/प्र.क्र.२१०/११-अे**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- १७ जून,२००९.**

**वाचा:-**१) केंद्र शासनाचे कृषि व सहकार विभागाचे पत्र क्र. १३०११/०१/२००८/क्रेडीट-२ , दि. १२ मार्च, २००९

२) भारतीय कृषि विमा कंपनीचे पत्र क्रमांक एमआरओ/५००/०९, दिनांक १४ मे,२००९.

३) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.हपिवियो-२००८/प्र.क्र.२१५/११-अे, दि.१९ जून,२००८ व समक्रमांकाचे शुध्दिपत्रक दिनांक ३ जुलै,२००८.

४) आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.हआपिवियो-चा-८/१०४/२००९, दिनांक १७ जून,२००९.

**शासन निर्णय :-**

खरीप हंगामामध्ये पर्जन्यमान या हवामान घटकाचा पीक परिस्थितीवर मोठया प्रमाणावर परिणाम होत असल्याने हवामान आधारित पीक विमा योजना राज्यांत सन २००९ मध्ये पथदर्शक स्वरुपात राबविण्यांचा निर्णय घेण्यांत आला आहे. सदर योजना केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनानुसार; **अपुरा पाऊस, पावसात पडणारा खंड / वितरण व अतिपाऊस** या तीन धोक्यांपासून संरक्षण देणारी हवामान आधारित पीक विमा योजना राज्यातील कपाशी पिकासाठी ; बुलढाणा, अकोला, वाशिम, अमरावती, यवतमाळ व वर्धा या ६ जिल्ह्यातील अनुक्रमे बुलढाणा, अकोला, वाशिम, अमरावती, यवतमाळ व वर्धा या ६ तालुक्यांमध्ये ((referance unit area)) राबविण्यांत येणार आहे.

**योजनेची उद्दिष्टे :-**

१) पीक पेरल्यापासून पीक तयार होण्याच्या कालावधीत अपुरा पाऊस, पावसात पडणारा खंड / वितरण व अतिपाऊस या पासून नुकसान झाल्यास योजनेच्या तरतुदीप्रमाणे शेतक-यांना विमा संरक्षण आणि आर्थिक सहाय्य देणे

२) पिकाचे नुकसानीच्या अत्यंत कठिण परिस्थतीतही शेतक-यांचे आर्थिक स्थैर्य अबाधित राखणे .

**योजनेत समाविष्ट पीक व शेतकरी :-**

अ) हवामान आधारित पीक विमा योजनेंतर्गत कपाशी पिकास विमा संरक्षण देय आहे.

ब) अधिसूचित क्षेत्रात अधिसूचित पिके घेणारे सर्व शेतकरी या योजनेत भाग घेण्यास पात्र आहेत.

क) विविध वित्तीय संस्थांकडे कापूस पीक कर्जासाठी अर्ज केलेल्या व ज्याची कपाशी पीक कर्ज मर्यादा मंजूर आहे अशा सर्व कर्जदार शेतक-यांना योजना सक्तिची राहील.

ड) बिगर कर्जदार शेतक-यांना योजना ऐच्छिक राहील.

**विमा संरक्षण मर्यादा :-** प्रति हेक्टरी रु.१५,०००/- पर्यंत विमा संरक्षण देय आहे. विमा संरक्षित रक्कम पुढील प्रमाणे विभागण्यांत आलेली आहे.

अपुरा पाऊस - रु.१०,०००/- प्रति हेक्टरी
पावसातील खंड - रु. ३०००/- प्रति हेक्टरी
अति पाऊस - रु.२०००/- प्रति हेक्टरी

**समाविष्ट धोके व कालावधी :-**

**१) अपुरा पाऊस**

अ) पहिला टप्पा १६ जून, २००९ ते १५ जुलै, २००९
ब) दुसरा टप्पा १६ जुलै, २००९ ते १५ ऑगस्ट, २००९
क) तिसरा टप्पा १६ ऑगस्ट, २००९ ते १५ सप्टेंबर, २००९
ड) चौथा टप्पा १६ सप्टेंबर, २००९ ते ३१ ऑक्टोबर, २००९

**२) पावसातील खंड** १ जुलै, २००९ ते १५ सप्टेंबर, २००९

**३) अति पाऊस**

अ) पहिला टप्पा १६ जून, २००९ ते १५ जुलै, २००९
ब) दुसरा टप्पा १६ जुलै, २००९ ते ३१ ऑगस्ट, २००९
क) तिसरा टप्पा १ सप्टेंबर, २००९ ते ३१ ऑक्टोबर, २००९

**विमा हप्ता दर :-**

कपाशी पिकासाठी १२ टक्के विमा हप्ता दर निर्धारीत करण्यांत आला आहे. प्रति हेक्टरी रु.१८००/- अधिक सेवाकर १०.३० टक्के दराने रु.१८५.४० असा एकूण प्रति हेक्टरी रू. १९८५.४० विमा हप्ता ठेवण्यात आला आहे.

**विमा हप्ता अनुदान :-**

पथदर्शक हवामान आधारित पीक विमा योजनेमध्ये भाग घेण्या-या सर्व शेतक-यांना विमा हप्त्यापोटी ५० टक्के अनुदान देय आहे. या अनुदानाच्या रकमेत केंद्र व राज्य शासन यांचा समान हिस्सा ( केंद्र शासन २५ टक्के व राज्य शासन २५ टक्के ) आहे. पथदर्शक हवामान आधारित पीक विमा योजनेत अधिसूचित ६ तालुके विदर्भ पॅकेज मधील जिल्हयांतील असून विदर्भ पॅकेजद्वारे राष्ट्रीय पीक विमा योजनेमधे कपाशी पिकासाठी अल्प व अत्यल्प भूधारक शेतक-यांना ७५ टक्के ( राज्य शासन ७० टक्के/ केंद्र शासन ५ टक्के) व इतर शेतक-यांना ५० टक्के अनुदान आहे. राज्य शासनाची ही अनुदान मर्यादा हवामान आधारित पीक विमा योजनेमध्येही कायम ठेवण्यात येत असून केंद्राचे २५ टक्के अनुदान सर्व शेतक-यांना देय असल्याने कपाशी पिकासाठी अल्प व अत्यल्प भूधारक शेतक-यांना ९५ टक्के एकूण विमा हप्ता अनुदान राहील व इतर शेतक-यांना ७५ टक्के विमा हप्ता अनुदान राहील.

**अल्प भूधारक** - २ हेक्टर ( ५ एकर) किंवा त्यापेक्षा कमी परंतु १ हेक्टरच्या वर पर्यत धारण क्षेत्र असलेले शेतकरी

**अत्यल्प भूधारक** - १ हेक्टर ( २.५ एकर) किंवा त्यापेक्षा कमी धारण क्षेत्र असलेले शेतकरी

**वरीलप्रमाणे अनुदानानुसार प्रति हेक्टरी विमा हता :-**

**(रुपये)**

| **शेतकरी प्रकार** | **प्रति हेक्टरी विमा हप्ता रुपये** | **सेवा करासह एकूण विमा हप्ता रुपये** | **शेतक-याने भरावयाचा विमा हप्ता रुपये (सेवाकरासहित)** | **केंद्र शासनाचे अनुदान रुपये** | **राज्य शासनाचे अनुदान रुपये** |
|---|---|---|---|---|---|
| **अल्य व अत्यल्प भूधारक** | १८०० | १९८५.४० | ९९.२७ | ४९६.३५ | १,३८९.७८ |
| **इतर शेतकरी** | १८०० | १९८५.४० | ४९६.३५ | ४९६.३५ | ९९२.७ |

**वरील कार्यक्रमाबाबतचे हंगामनिहाय वेळापत्रक पुढील प्रमाणे आहे :-**

| **तपशिल** | **अंतिम तारीख** | **शेरा** |
|---|---|---|
| विमा संरक्षण कालावधी | १६ जून, २००९ ते<br>३१ ऑक्टोबर, २००९ | |
| कर्जदार शेतकरी / कर्ज घेतलेले व बँकेकडून कापूस पीक कर्ज मर्यादा मंजूर असलेले शेतकरी | १५ जुलै, २००९ | ज्या शेतक-यांची कपाशी पिकासाठी बँकांकडून कर्जमर्यादा मंजूर असेल त्या सर्व शेतक-यांच्या क्षेत्राचा विमा प्रस्ताव विहित मुदतीत (१५ जुलै, २००९) पर्यंत करुन घेणे बॅकांना अनिवार्य आहे. |
| बिगर कर्जदार शेतक-यांनी विमा प्रस्ताव (प्रपोजल ) बॅकांना सादर करण्याची मुदत | २५ जून, २००९ | |
| बँकांनी कर्जदार शेतक-यांची घोषणा पत्रे (डिक्लेरेशन) कृषि विमा कंपनीस सादर करण्याची मुदत | १४ ऑगस्ट, २००९ | |
| बिगर कर्जदार शेतक-यांची घोषणापत्रे (डिक्लेरेशन) बँकांनी कृषि विमा कंपनीस सादर करण्याची मुदत | १० जुलै, २००९ | |

| | | |
|---|---|---|
| पर्जन्यमान आकडेवारी सादर करणे | दर आठवडयाला दैनंदिन पर्जन्यमान सादर करणे. | नोंदणीकृत संस्थेमार्फत स्वयंचलित हवामान केंद्रे कृषि विमा कंपनीने स्थापित करुन आकडेवारी प्राप्त करुन घेणे |
| नुकसान भरपाई अदा करणे | विमा कालावधी संपल्यापासून ४५ दिवस | विमा हप्ता अनुदान व कृषि विमा कंपनीचे पर्जन्यमान आकडेवारी वेळेत मिळण्याच्या अटीचे अधीन राहून. |

**बॅक सेवा शुल्क :-**

**कर्जदार शेतकरी :-** कर्जदार शेतकऱ्यांकडून जमा केलेल्या विमा हप्त्याच्या ५ टक्के रक्कम कृषि विमा कंपनीने बँक सेवा शुल्क म्हणून नोडल बँकांना देय आहे.

**बिगर कर्जदार शेतकरी :-** बिगर कर्जदार शेतकऱ्यांकडून जमा केलेल्या विमा हत्प्याच्या १० टक्के रक्कम कृषि विमा कंपनीने बँक सेवा शुल्क म्हणून नोडल बँकांना देय आहे.

**नुकसान भरपाई ठरविण्याची पध्दती :-**

अधिसूचित तालूक्यातील मागील २५ वर्षाचे पर्जन्यमान लक्षांत घेवून सर्व अधिसूचित तालुक्यांसाठी पिकाचे अवस्थेनुसार पर्जन्यमानाची प्रमाणके (ट्रिगर) निश्चित करण्यांत आली आहेत. या प्रमाणकांपेक्षा

कमी / जास्त पाऊस झाल्यास त्याप्रमाणांत निर्धारित दराने नुकसान भरपाई निश्चत करण्यांत येईल. नुकसान भरपाईची रक्कम पूर्णपणे विमा कंपनी अदा करणार आहे.

1. १) नुकसान भरपाई ठरविण्यासाठी कृषि विमा कंपनीने त्या त्या तालुक्यातील नोंदणीकृत संस्थेमार्फत स्थापित केलेल्या स्वयंचलित पर्जन्यमापन केंद्रात (संदर्भ पर्जन्यमापन केंद्र) नोंद झालेल्या आकडेवारीचा वापर केला जाईल.

२) जर त्या तालुक्यातील संदर्भ पर्जन्यमापन केंद्रामार्फत काही कारणास्तव पर्जन्य आकडेवारी प्राप्त झाली नाही तर त्या कालावधी पुरती पर्यायी राज्य शासनाच्या पर्जन्यमापन केंद्राची आकडेवारी विचारात घेवून नुकसान भरपाई निश्चित करण्यांत येईल.

३) संदर्भ पर्जन्यमान केंद्र हे त्या तालुक्यातील कृषि विमा कंपनीने नोंदणीकृत संस्थेमार्फत स्थापित केलेले पर्जन्यमापन केंद्र राहील.

४) संदर्भ पर्जन्यमान केंद्रामार्फत प्राप्त पर्जन्य आकडेवारी ही ग्राहय धरण्यात येवून त्यावर आधारित योजनेच्या तरतुदीनुसार निश्चित करण्यात आलेली नुकसान भरपाई ही अंतिम राहील.

५) नुकसान भरपाई ठरविण्याचा आराखडा मागील २५ वर्षाचे पर्जन्यमानाचा विचार करून निश्चित करण्यात आलेला आहे. यामध्ये ट्रिगर पर्जन्य प्रमाणके, त्यानुसार नुकसान भरपाईचा दर आणि पूर्णपणे नुकसान भरपाई देय असलेले ट्रिगर पर्जन्य प्रमाणके निश्चित करण्यात आलेले आहेत. ट्रिगर पर्जन्य प्रमाणके पिकांच्या वाढीच्या अवस्थेनुसार वेगवेगळी निश्चित करण्यात आलेली आहेत.(सोबतच्या सहपत्र -१ प्रमाणे)

राष्ट्रीय कृषि विमा योजनेच्या तुलनेत हवामान आधारित पीक विमा योजनेची उपयुक्तता तपासण्याच्या दृष्टीने अधिसूचित तालुक्यामध्ये राष्ट्रीय कृषि विमा योजनेतील नियोजनाप्रमाणे पीक कापणी प्रयोग घेण्यांत येणार आहेत.

राष्ट्रीय कृषि विमा योजनेनुसार स्थापित राज्यस्तरीय समन्वय समिती, जिल्हास्तरीय तांत्रिक समिती, समन्वय समिती तसेच निर्धारित वित्तीय संस्था, बँका, राज्य शासन, कृषि विमा कंपनी, कृषि आयुक्तालय यांची निर्धारित कर्तव्ये व जबाबदाऱ्याप्रमाणेच हवामान आधारित पीक विमा योजनेसाठी कर्तव्ये व जबाबदा-या रहातील तसेच पथदर्शक हवामान आधारित पीक विमा योजनेच्या अंमलबजावणीची कार्यपध्दती (operational modalities) लागू राहील.

हवामान आधारित पीक विमा योजना सन २००९-१० च्या खरीप हंगामापासून सुरु करावयाची आहे. वरील सर्व सूचना लक्षांत घेवून सर्व सबंधितांनी तात्काळ योजनेची अंमलबजावणी सुरु करावी व योग्य ती प्रचार-प्रसिध्दी करुन योजना प्रभावीपणे कार्यान्वीत होईल हे पहावे.

योजनेत सहभागी होणा-या शेतकऱ्यांना द्यावयाचे अनुदानासाठी राज्य शासनाच्या हिश्श्यापोटी येणारा खर्च पुढील लेखाशीर्षाखालील अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक डी- ३**
**२४०१ - पीक संवर्धन**
**११० - पीक विमा**
**११० - ( दोन) पंचवार्षिक योजनेंतर्गत योजना**
**राज्य योजना (००) (०२) सर्वंकष पीक विमा योजना**
**( २४०१ ०९२ २ ) ३३ अर्थसहाय्य**

सदर प्रयोजनार्थ **सहाय्यक संचालक, लेखा-१, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे- १ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यांत येत आहे.**

सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्र.१७४ /१४३१, दि. १२ जून,२००९ व क्र.१०७/०९/व्यय-१, दि.१७ जून,२००९ अन्वये निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट शासनाच्या www. maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक 20090618123743001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( ब. दि. उमाटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**प्रति**

मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (कृषि ) यांचे खाजगी सचिव
मा मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (नियोजन) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
अपर मुख्य सचिव (महसूल) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव ,कृषि मंत्रालय, भारत सरकार (कृषि व सहकार विभाग) कृषि भवन, नवी दिल्ली.(पत्राने)
सचिव, वित्त मंत्रालय, भारत सरकार (वित्त विभाग) (विमा ) नवी दिल्ली. (पत्राने)
आयुक्त, कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
अध्यक्ष व कार्यकारी संचालक, भारतीय कृषि विमा कंपनी, १३ वा मजला, अंबादीप बिल्डींग, कस्तुरबा गांधी मार्ग, कॅनॉट प्लेस, नवी दिल्ली
प्रादेशिक व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी, २० वा मजला, स्टॉक एक्सचेंज बिल्डींग, मुंबई -४००० ०२३
संचालक लेखा व कोषागारे, मुंबई
विभागीय महसूल आयुक्त, अमरावती / नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई - ३२
महाव्यवस्थापक, महाराष्ट्र नागरी बॅका, ९ नगीनदास रोड, मुंबई-२३
महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर
विमा संचालक, म्हाडा इमारत, पहिला मजला, बांद्रा (पूर्व), मुंबई
संचालक, माहिती आणि प्रसिध्दी (प्रसिध्दीसाठी) मंत्रालय, मुंबई
संचालक, फलोत्पादन, /मृद संधारण/ नियोजन/ विस्तार व प्रशिक्षण / साखर संचालक /

मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, पुणे.
जिल्हाधिकारी, अमरावती / अकोला/ वर्धा / वाशिम / बुलढाणा / यवतमाळ
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती / अकोला / वर्धा / वाशिम / बुलढाणा / यवतमाळ
व्यवस्थापक, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बॅक, अमरावती / अकोला/वर्धा/ वाशिम/ बुलढाणा/ यवतमाळ
सर्व विभागीय कृषि सह संचालक, महाराष्ट्र राज्य
उप महाव्यवस्थापक, नाबार्ड, पुनम चेंबर, ५४ वेलस्ली रोड, शिवाजीनगर, पुणे-५
पत विशेषज्ञ, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
मुख्य अधिकारी, मध्यवर्ती वित्त संस्था, महाराष्ट्र राज्य सहकारी बॅक, ९ नगीनदास रोड, मुंबई- २३
मुख्य अधिकारी, ग्रामीण नियोजन व पत विभाग, रिझर्व्ह बॅक ऑफ इंडिया, फोर्ट, मुंबई
महाव्यवस्थापक, राज्यस्तरीय बँकर्स कमिटी ( SLBC), बँक ऑफ महाराष्ट्र, मुख्य कार्यालय १५०१ , शिवाजी नगर, पुणे-५
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, अमरावती / अकोला / वर्धा / वाशिम / बुलढाणा / यवतमाळ
अवर सचिव, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक
निवड नस्ती ११-अे.

## सहपत्र-१

## पथदर्शी हवामान आधारित पीक विमा योजना (खरीप -२००९)

**पीक : कापूस**

सदर योजनेत अपुरा पाऊस, पावसातील खंड व अति पाऊस यामुळे कापूस उत्पादनात होणाऱ्या विपरित परिणामांपासून विमा संरक्षण देण्यात आले आहे. विमा कालावधीत संदर्भ हवामान केंद्रात मोजलेल्या पावसाचे ठरविलेल्या ट्रीगर (पावसाचे प्रमाण) पासून कमी किंवा जास्त विचलन झाल्यास त्यामुळे होणाऱ्या संभाव्य पीक नुकसानीस ठरविलेल्या दराने नुकसान भरपाई देण्यात येते.

**१.पावसाचे प्रमाण :** या योजनेचा मुख्य उद्देश कापूस उत्पादक शेतकऱ्यांना १६ जून ते ३१ ऑक्टोबर या कालावधीत अपुऱ्या पावसामुळे होणाऱ्या संभाव्य पीक (आर्थिक) नुकसान भरपाई करणे हा होय. या कवरचे दोन प्रकार आहेत.

**१ अ. : अपुरा पाऊस :** या योजनेचे ४ टप्प्यात विभाजन केले आहे.

टप्पा (१) १६ जून ते १५ जुलै
टप्पा (२) १६ जुलै ते १५ ऑगस्ट
टप्पा (३) १६ ऑगस्ट ते १५ सप्टेंबर
टप्पा (४) १६ सप्टेंबर ते ३१ ऑक्टोबर हे अनुक्रमे पेरणी, पीक वाढ, फूल धारणा, बोंडे लागणे व बोंडे तयार होणे या अवस्थांशी जवळपास समांतर आहेत.

**टप्पा १ : १६ जून ते १५ जुलै** या कालावधीत जर एकूण पाऊस १०० मि.मी. पेक्षा कमी व ४० मि.मी. पेक्षा जास्त असेल तर, कमी असलेल्या प्रत्येक मि.मी. पावसाला शेतकऱ्यांना रु.१०/- प्रति मि.मी. प्रमाणे जास्तीत जास्त रु.६००/- आर्थिक नुकसान भरपाई मिळेल. जेव्हा या कालावधीत एकूण पाऊस ४० मि. मी. पेक्षा कमी असलेल्या प्रत्येक मि.मी. पावसाला शेतकऱ्यांना रु.४७.५०/- प्रति मि.मी. प्रमाणे कमाल रु १९००/- आर्थिक नुकसान भरपाई मिळेल. या टप्प्यात एकूण रु.२५००/- आर्थिक नुकसान भरपाई मिळेल.

**टप्पा २ : १६ जुलै ते १५ ऑगस्ट** या कालावधीत जर एकूण पाऊस २०० मि.मी. पेक्षा कमी व ७० मि. मी. पेक्षा जास्त असेल तर, कमी असलेल्या प्रत्येक मि.मी. पावसाला शेतकऱ्याना रु.८/- प्रति मि.मी. प्रमाणे जास्तीत जास्त रु.१०४०/- आर्थिक नुकसान भरपाई मिळेल. जेव्हा या कालावधीत एकूण पाऊस ७० मि.मी. पेक्षा कमी असेल, तेव्हा कमी असलेल्या प्रत्येक मि. मी. ला शेतकऱ्यांना रु.२८ /- प्रति मि.मी. प्रमाणे कमाल रु.१९६०/- आर्थिक नुकसान भरपाई मिळेल. या टप्प्यात एकूण रु.३०००/- आर्थिक नुकसान भरपाई मिळेल.

**टप्पा ३.: १६ ऑगस्ट ते १५ सप्टेंबर** या कालावधीत जर एकूण पाऊस १३० मि.मी. पेक्षा कमी व ४० पेक्षा जास्त असेल तर, कमी असलेल्या प्रत्येक मि. मी. पावसाला शेतकऱ्यांना रु.८/- प्रति मि.मी. प्रमाणे जास्तीत जास्त रु. ७२०/- आर्थिक नुकसान भरपाई मिळेल. जेव्हा या कालावधीत एकूण पाऊस ४० मि.मी. पेक्षा कमी असेल, तेव्हा कमी असलेल्या प्रत्येक मि.मी. ला शेतकऱ्यांना रु.४४.५० /- प्रति मि.मी. प्रमाणे कमाल रु.१७८०/- आर्थिक नुकसान भरपाई मिळेल. या टप्प्यात एकूण रु.२५००/- आर्थिक नुकसान भरपाई मिळेल.

**टप्पा ४ : १६ सप्टेंबर ते ३१ ऑक्टोबर** या कालावधीत जर एकूण पाऊस ७० मि.मी. पेक्षा कमी व २० मि. मी. पेक्षा जास्त असेल तर, कमी असलेल्या प्रत्येक मि.मी. पावसाला शेतकऱ्यांना रु.१२/- प्रति मि.मी. प्रमाणे जास्तीत जास्त रु ६००/- आर्थिक नुकसान भरपाई मिळेल. जेव्हा या कालावधीत एकूण पाऊस २० मि.मी. पेक्षा कमी असेल, तेव्हा कमी असेल्या प्रत्येक मि.मी. ला शेतकऱ्यांना रु.७०/- प्रति मि.मी. प्रमाणे कमाल रु १४००/- आर्थिक नुकसान मिळेल. या टप्प्यात एकूण रु.२०००/- आर्थिक नुकसान भरपाई मिळेल.

**टीप :** कुठल्याही टप्प्यात ट्रीगरच्या दुप्पटीपेक्षा जास्त पाऊस पडल्यास तो पाऊस पुढील टप्प्यात मोजण्यासाठी ग्राहय धरण्यात येईल.

एकूण पाऊस टप्पा १ मध्ये ट्रीगरच्या दुप्पटीपेक्षा जास्त पाऊस पडल्यास ट्रीगरपेक्षा जास्तीच्या पावसापैकी २५% पाऊस टप्पा २ मध्ये मोजला जाईल.

एकूण पाऊस टप्पा २ मध्ये ट्रीगरच्या दुप्पटीपेक्षा जास्त पाऊस पडल्यास ट्रीगरपेक्षा जास्तीच्या पावसापैकी ३०% पाऊस टप्पा ३ मध्ये मोजला जाईल.

एकूण पाऊस टप्पा ३ मध्ये ट्रीगरच्या दुप्पटीपेक्षा जास्त पाऊस पडल्यास ट्रीगरपेक्षा जास्तीच्या पावसापैकी ३०% पाऊस टप्पा ४ मध्ये मोजला जाईल.

| **कालावधी** | **टप्पा-१** | **टप्पा-२** | **टप्पा-३** | **टप्पा-४** |
|---|---|---|---|---|
| | १६ जून ते १५ जुलै | १६ जुलै ते १५ ऑगस्ट | १६ ऑगस्ट ते १५ सप्टेंबर | १६ सप्टेंबर ते २१ ऑक्टोबर |
| ट्रीगर १ (या पेक्षा कमी ) मि.मी. | १०० | २०० | १३० | ७० |
| ट्रीगर १ (या पेक्षा कमी ) मि.मी. | ४० | ७० | ४० | २० |
| कमाल नुकसान भरपाई योग्य पाऊस (मि.मी.) | ० | ० | ० | ० |
| भरपाई दर १ (रु.प्रति मि.मी.) | १० | ८ | ८ | १२ |
| भरपाई दर २ (रु.प्रति मि.मी.) | ४७.५ | २८ | ४४.५ | ७० |
| कमाल नुकसान भरपाई | २५०० | ३००० | २५०० | २००० |

**<u>१.ब.पावसातील खंड :</u>** १ जुलै ते १५ सप्टेंबर या कालावधीत सलग कोरडया दिवसातून होणाऱ्या पीक नुकसानीस विमा संरक्षण मिळते. पाऊस वितरण कालावधीत कुठल्याही सलग २ दिवशी एकूण ५ मि.मी. पेक्षा कमी पाऊस पडल्यास कोरडा दिवस म्हणून गणण्यात येईल. जर एकूण सलग कोरडे दिवस १५ ते २१ असतील तर रु.५००/-, असे सलग कोरडे दिवस २२ ते २९ असतील तर रु १२५०/-, असे सलग कोरडे दिवस ३० किंवा ३० पेक्षा जास्त असतील तर रु.३०००/- नुकसान भरपाई मिळेल.

| **पावसातील खंड (लागोपाठ कोरडे दिवस)** | **कालावधी** | **१ जुलै ते १५ सप्टेंबर** | | |
|---|---|---|---|---|
| | ट्रीगर दिवस (हे किंवा हयापेक्षा जास्त) | १५ | २२ | ३० |
| | कमाल नुकसान भरपाई (रु. प्रति हे.) | ५०० | १२५० | ३००० |
| | कमाल नुकसान भरपाई (रु.प्रति हे.) | ३००० | | |

**२. अति पाऊस :** अति पाऊस विमा संरक्षणाचे तीन टप्प्यात विभाजन केले आहे.

टप्पा १- १६ जून ते १५ जुलै

टप्पा २-  १६ जुलै ते ३१ ऑगस्ट

टप्पा ३-  १ सप्टेंबर ते ३१ ऑक्टोबर.

**टप्पा १ : १६ जून ते १५ जुलै :** या कालावधीत कोणत्याही दिवशी जेवढा पाऊस ६५ मि.मी. पेक्षा जास्त होईल तेवढा त्या दिवसाचा अतिरिक्त पाऊस म्हणून गणला जाईल. या कालावधीत अशा प्रत्येक दिवसांच्या अतिरिक्त पावसाची बेरीज ही नुकसान भरपाई देण्यासाठी केली जाईल आणि नुकसान भरपाई ही रु ४/- प्रति मि.मी. प्रमाणे देण्यात येईल. जर एकूण अतिरिक्त पाऊस (बेरीज) २०० मि.मी. किंवा २०० मि.मी. पेक्षा जास्त असेल तर नुकसान भरपाई रु.५००/- मिळेल.

**टप्पा २ : १६ जुलै ते ३१ ऑगस्ट :** या कालावधीत कोणत्याही  दिवशी जेवढा पाऊस १२५मि. मी. पेक्षा जास्त होईल तेवढा त्या दिवसाचा अतिरिक्त पाऊस म्हणून गणला जाईल. या कालावधीत अशा प्रत्येक दिवसाच्या अतिरिक्त पावसाची बेरीज ही नुकसान भरपाई देण्यासाठी केली जाईल आणि नुकसान भरपाई ही रु. ६/- प्रति मि. मी. प्रमाणे देण्यात येईल . जर एकूण  अतिरिक्त पाऊस (बेरीज) २५० मि.मी. किंवा २५० मि.मी. पेक्षा जास्त असेल तर नुकसान भरपाई रु.७५०/- मिळेल.

**टप्पा ३ : १ सप्टेंबर ते ३१ ऑक्टोबर** : या कालावधीत कोणत्याही दिवशी जेवढा पाऊस ६५ मि.मी. पेक्षा जास्त होईल तेवढा त्या दिवसाचा अतिरिक्त पाऊस म्हणून गणला जाईल. या कालावधीत अशा प्रत्येक दिवसाच्या अतिरिक्त पावसाची बेरीज ही नुकसान भरपाई देण्यासाठी केली जाईल आणि नुकसान भरपाई ही रु.६.८२/- प्रति मि. मी. प्रमाणे देण्यात येईल. जर एकूण अतिरिक्त पाऊस (बेरीज) १७५ मि. मी. किंवा १७५ मि. मी.पेक्षा जास्त असेल तर नुकसान भरपाई रु.७५०/- मिळेल.

| **कालावधी** | **१६ जून ते १५ जुलै** | **१६ जुलै ते ३१ऑगस्ट** | **१ सप्टेंबर ते ३१ ऑक्टोबर** |
|---|---|---|---|
| दैनंदिन पाऊस ट्रीगर (मि. मी.) (यापेक्षा जास्त) | ६५ | १२५ | ६५ |
| कमाल नुकसान भरपाई योग्य पाऊस (मि. मी.) | २०० | २५० | १७५ |
| भरपाई दर (रु.प्रति हे.) | ४ | ६ | ६.८२ |
| कमाल नुकसान भरपाई ( रु. प्रति हे.) | ५०० | ७५० | ७५० |
| **एकूण नुकसान भरपाई (रु. प्रति हे.)** | **२०००** | | |

एकूण विमा संरक्षित रक्कम आणि विमा हप्ता प्रति हेक्टर :

| | |
|---|---|
| एकूण विमा संरक्षित रक्कम प्रति हे. (रु.) | १५००० |
| अल्प व अत्यल्प भूधारकशेतकऱ्यांनी भरावयाचा विमा हप्ता (सेवा करासह) रु. | ९९.२७ |
| इतर शेतकऱ्यांनी भरावयाचा विमा हप्ता (सेवा करासह) रु. | ४९६.३५ |

**सहभाग प्रक्रिया :**

**कर्जदार शेतकरी : अनिवार्य  सहभाग** : बँकांकडून कापूस पिकासाठी कर्ज मर्यादा मंजूर असणा-या सर्व शेतकऱ्यांचा विमा हा त्या त्या बँकांकडून आपोआप केला जाईल.

**बिगर कर्जदार शेतकरी :** ऐच्छिक सहभाग सदर शेतकऱ्यांनी प्रस्ताव पत्रक भरुन रोख विमा हप्तासह आपले खाते असणाऱ्या बँक शाखेत विहीत मुदतीत जमा करावा.

******